नवीन बंदर विकास धोरण २०१०
अकृषिक आकारणीमधून सूट देणेबाबत..

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्र.एनएपी ०७११/प्र.क्र. ८१/ल-५,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. २० सप्टेंबर, २०११

संदर्भ:- शासन निर्णय, गृहविभाग, क्र. पीआरटी ०५०९/प्र. क्र. २३१/ बंदरे-१, दि. २० ऑगस्ट, २०१०

शासन निर्णय:- महाराष्ट्र राज्याच्या किनारपट्टीवरील लहान बंदरे/बहुउद्देशिय जेट्टी/कार्गो टर्मिनस (रो-रो सर्व्हीसेस) यांच्या विकासाच्या प्रचलित धोरणामध्ये तात्काळ प्रभावाने सुधारणा करण्यासाठी दि. २४.६.२०१० रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीमधील निर्णयाच्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकल्प उभारण्यासाठी जमीनीच्या वापरात बदल करावयाचा झाल्यास, अकृषिक आकारणी माफ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. मंत्रीमंडळाच्या दि. २४.६.२०१० च्या निर्णयानुसार, आता महाराष्ट्र राज्याच्या किनारपट्टीवरील खाजगी तत्वावरील नवीन लहान बंदरे/ बहुउद्देशिय जेट्टी/ कार्गो टर्मिनस या प्रकल्पांना महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ च्या कलम ७८ मधील तरतुदींनुसार खालील अटींच्या/शर्तींच्या अधीन राहून अकृषिक आकारणीमधून सूट देण्यात येत आहे.

१. लहान बंदरे/बहुउद्देशिय जेट्टी/कार्गो टर्मिनस (रो-रो सर्व्हीसेस) या नव्याने होणाऱ्या प्रकल्पांना उदयोगाचा दर्जा दिलेला असल्याने, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ मधील कलम ४४ (क) नुसार जमीनीच्या वापरातील बदलाबाबत अकृषिक परवानगीची आवश्यकता नाही.

२. लहान बंदरे/बहुउद्देशिय जेट्टी/कार्गो टर्मिनस (रो-रो सर्व्हीसेस) हे नव्याने होणारे प्रकल्प पूर्णपणे विकसीत झाल्यानंतर आणि त्यानुषंगाने शासनासोबत सुधारीत करारनामा झाल्यानंतर, स्वाक्षांकीत केल्याच्या दिनांकापासून ८ वर्षांच्या कालावधीपर्यंतच अकृषिक

आकारणीमधून सूट देण्यात येईल. सदरहू सूट, वरीलप्रमाणे ८ वर्षांचा कालावधी ज्या दिवशी पूर्ण होईल त्या दिनांकापासून आपोआप रद्द होईल.

३. अकृषिक आकारणीमधून देण्यात येणारी सूट ही महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ मधील कलम ६४ च्या अनुषंगाने आणि कलम ११७ (५) नुसार अनुज्ञेय असेल.

४. प्रस्तुत अकृषिक आकारणीमधील सूट ही, गृह विभागाच्या दि. २०.८.२०१० च्या शासन निर्णयान्वये, विहीत केलेल्या विशेष नियोजन प्राधिकरण (महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड) यांनी मान्यता दिलेल्या प्रकल्पांनाच लागू होईल.

३. सदरहू शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द केले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२०१०४१३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रमाकान्त असरे)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्यसचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई-३२
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (५ प्रती)
८. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई
९. जिल्हाधिकारी, रायगड/सिंधुदुर्ग/रत्नागिरी/ठाणे/मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
११. प्रधानसचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१२. सहसचिव/उपसचिव (सर्व), महसूल व वन विभाग
१३. सर्व अवरसचिव/कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग
१४. निवडनस्ती, ल-५